राज्य युवा विकास निधीस अनुदान वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो २०१८ /प्र.क्र.१४३ /क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०४ जुलै, २०१८.

वाचा:-

१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.युकयो १६१३/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३ दि. १९ डिसेंबर,२०१३.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८.
३) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.निधी वितरण/योजना-५६७१/२०१८-१९/का-१०/१८३७ दि. २४ मे, २०१८.

**प्रस्तावना: -**

राज्यातील युवांना सक्षम करण्यासाठी विविध युवक कल्याण विषयक उपक्रमांना सहाय्य करण्याकरिता, तसेच राज्यात युवा विकासाचे उपक्रम परिणामकारकरित्या राबविण्यासाठी, त्याचप्रमाणे राज्यातील उदयान्मुख युवांना उज्वल भविष्याच्या संधी वृध्दिंगत करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन व आर्थिक सहाय्य देण्याची गरज लक्षात घेऊन राज्य युवा विकास निधीची करण्यास शासन निर्णय क्र. युकयो १६१३/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३ दि. १९ डिसेंबर, २०१३ अन्वये स्थापना करण्यांत आली आहे. सन २०१७-१८ मध्ये सदर बाबीकरीता २८.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सन २०१८-१९ या कालावधीत प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.३५.०० लक्ष इतक्या तरतुदीपैकी वित्त विभागाच्या दि. २/४/२०१८ च्या परिपत्रकास अनुसरुन ७०% च्या मर्यादेत रु.२४.५० लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब या नस्तीच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वर्षाकरीता राज्यात युवा विकासाचे विविध उपक्रम परिणामकारकरित्या राबवून राज्यातील युवांना सक्षम करण्याकरीता युवा विकास निधीअंतर्गत रु. ३५.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.२४.५० लक्ष (रू.चोवीस लक्ष पन्नास हजार फक्त) तरतूद वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०३, (०१)(०९) राज्य युवा विकास निधीस अनुदान (२२०४ ५६७१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २/४/२०१८च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०४१५२६५५२५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.07.04 15:27:46 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
१०) वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे.
११) निवडनस्ती, क्रीयुसे-३